२०१५०६२३१५२५४१०८२७

(२८८)

पालखार खारभूमी योजना ता.पेण, जि.रायगड
या योजनेच्या नुतनीकरणाच्या कामास
प्रशासकी मान्यता प्रदान करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन

जलसंपदा विभाग

शासन निर्णय क्र.खाभूयो २०१०/(४६९/२०१०) खारभूमी
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :-२२/०६/२०११

पहावे : मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांचे पत्र क्र.३८०६/खाभू/पालखार/ तां-२(१) ७४४६, दि.१९/१०/२०१०

प्रस्तावना :-

पालखार खारभूमी योजना ता.पेण, जि.रायगड, सदर खारभूमी योजना बृहत आराखडयात समाविष्ट आहे. केंद्रीय वन मंत्रालयाने किनारी नियमन अधिनियम १९९१(CRZ) अन्वये या योजनेस सूट दिली आहे. सदर योजनेची एकूण लांबी २५०५ मी. असून त्यावर सा.क्र.४०५ मी. ते ४३० मी. वर दोन उघाडीचा समावेश आहे. सदर योजना स्थानिक माती वापरुन बांधले होते. योजनेचा बांध अतिशय कमकुवत झालेला असल्याने व उघाडया नादुरुस्त झाल्या असल्याने शेतक-यांचे मोठे नुकसान होत आहे. यासाठी याची नूतनीकरण होणे अत्यंत गरजेचे आहे. ही नूतनीकरण योजना तातडीने हाती घेण्याबाबत लाभधारक व ग्रामपंचायतीची आग्रही लेखी स्वरुपात मागणी केली आहे. तसेच स्थानिक लोकप्रतिनिधी यांचेकडून सुध्दा लेखी मागणी करण्यात आलेली आहे. त्यामुळे सदर योजनेचा प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांच्याकडून प्राप्त झाला असून सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

शासन निर्णय

या शासन निर्णयान्वये पालखार खारभूमी योजना ता.पेण, जि.रायगड या योजनेस सन २००८-०९ व सा.बां.वि. दरसूची २००९-१० या वर्षाच्या दरसूचीवर आधारित या योजनेस अंदाजित किंमत रू.१,१३,५६,६८१/- (रुपये एक कोटी, तेरा लक्ष, छप्पन हजार, सहाशे एक्याऐंशी फक्त) असून (यापैकी रू.१०,३२,४२६/- अनुषंगिक खर्च आहे.) या रकमेस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. उपशीर्षवार तरतूदीचा गोषवारा सोबत जोडलेल्या परिशिष्टामध्ये देण्यात येत आहे.

२. या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्रमांक आय-३, मुख्य लेखाशिर्ष "४४०२ मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च योजनांतर्गत, (२०३) मृद संधारण, (०१) खार जमिन योजना, (०१) बांधकामे-२७-लहान बांधकामे (४४०२०३८४) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व त्यावरील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय पाटबंधारे व वीज विभाग क्र.एपीएच १०७३/३२६५३/ई(३),दि.१७.७.१९७४ मधील परिशिष्ट क्र.(३) व शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-१०.०६/प्र.क्र.८२/०६ विनियम दिनांक १३/०३/२००७ मधील तरतूदीनुसार आंतर वित्त सल्लागार व सह सचिव यांच्या सहमतीने प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

४. या योजनेस प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता (३८/२०११) अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( ज.प्र.जहागिरदार )
शासनाचे अवर सचिव

प्रतिलीपी अंदाजाच्या गोषवा-यासह :-

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा), मुंबई / नागपूर
स्वीय सहाय्यक, मा.मंत्री (खारजमीन), मंत्रालय, मुंबई
स्वीय सहाय्यक, मा.राज्यमंत्री (खारजमीन), मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता, (दवप्र) व सहसचिव, मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई
आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उपसचिव (लघु पाटबंधारे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रकल्प संचालक व अधीक्षक अभियंता, खारभूमी विकास मंडळ, ठाणे
अवर सचिव (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उपअभियंता (खारभूमी), जलसंपदा विभाग मंत्रालय, मुंबई
जिल्हाधिकारी, रायगड
अर्थशाखा १/२(२ प्रती), जलसंपदा विभाग,
खारभूमी कार्यासन, संग्रहार्थ.

D:\2011\MOHITE\suprama gr\New Microsoft Word Document.doc

शासन निर्णय क्रमांक खाभूयो २०१०/(५३७/२०१०) खारभूमी दिनांक २२/०६/२०११ चे सहपत्र
पालखार खारभूमी योजना ता.पेण, जि.रायगड, अंदाजपत्रकाचा गोषवारा

| अ.क्र. | उपशिर्ष | एकूण रुपयात |
|---|---|---|
| १ | 'अ' प्राथमिक | ५५१४७.०० |
| २ | 'बी' भूसंपादन | ०.०० |
| ३ | 'सी' मुख्य कामे | ८७१७८३८.०० |
| ४ | 'एफ' आर.एच.टी. वर्क्स | १४६४७६८.०० |
| ५ | 'के' इमारती | ०.०० |
| ६ | 'एम' वृक्षारोपण | ६०४५.०० |
| ७ | 'ओ' संकीर्ण | ५०००.०० |
| ८ | 'पी' देखभाल | २५४५७.०० |
| ९ | 'आर' दळणवळण | ५००००.०० |
| | एकूण | १,०३,२४,२५५.०० |
| | अनुषंगिक खर्च (भूसंपादन वगळून) | १०,३२,४२६.०० |
| | एकूण | १,१३,५६,६८१.०० |

<u>ठळक वैशिष्टये</u>

| | |
|---|---|
| पुन:प्रापित क्षेत्र | ९२ हेक्टर |
| प्रती हेक्टरी किंमत (रु.) | १२३४४२.०० |
| लाभव्यय गुणोत्तर | २.८४ |

D:\2011\MOHITE\suprama gr\New Microsoft Word Document.doc